## प.प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराजकृत
## श्रीदत्तलीलामृताब्धिसार

हा एक हजार ओंव्यांचा ग्रंथ पेटलाद येथें ७व्या चातुर्मासांत झाला. प्रत्येकीं १०० ओंव्याच्या दहा लहरींचा हा ग्रंथ प्राकृत असून, श्रीदत्तपुराण व श्रीदत्तमाहात्म्य यांतीलच दत्तचरित्र यांत संक्षेपानें आलें आहे. त्या ग्रंथांत अंतर्भूत असलेल्या श्रीदत्तसंप्रदायाचें तत्त्वज्ञान, उपासना व साधनमार्गाचें मार्गदर्शन, कार्तवीर्यार्जुन, यदु, अलर्कादि शिष्यांना श्रीदत्तप्रभूंनीं केलेल्या उपदेशाच्या माध्यमांतून साररूपानें आलें आहे. ग्रंथाची भाषा थोडी जुनी असली तरी सोपी व रसपूर्ण आहे आणि मांडणी सुबोध आहे. या ग्रंथांतील विषयानुक्रम असा आहे.

| लहरी | विषय |
|---|---|
| १ | दत्तावतार व अर्जुनानुग्रह. |
| २ | सप्तगाथा. |
| ३ | कार्तवीर्यप्रताप. |
| ४ | अर्जुनमुक्ति. |
| ५ | (परशु)रामोत्कर्ष. |
| ६ | मदालसोत्कर्ष. |
| ७ | अलर्कगति. |
| ८ | आयुर्वरदान. |
| ९ | नहुषविजय. |
| १० | यद्वनुग्रह, अलंकार. |
| | फलश्रुति. |

## ।। श्रीदत्तलीलामृताब्धिसार ।।

### ।। लहरी १।।

### श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः

ॐकार ज्याच्या वाचक । जगद्धेतू[1] धीप्रेरक । तोचि देव सच्चित्सुख । एक दत्त ।। १ ।।

दत्त अज निराकार । स्वेच्छामात्रें[2] हो साकार । अव्ययात्मा भक्ताधार । भक्तिगम्य ।। २ ।।

अहंकार नाहीं ज्यास । कर्तृत्वादि कैंचें त्यास । तत्त्व नेणे हें जो त्यास । खास बंध ।। ३ ।।

बंधें नानायोनि दुःख । भोगी जेव्हां जाणें एक । भक्तिमार्ग तेव्हां चोख । सुख पावे ।। ४ ।।

पावे ऐसें सौख्य धर्मे । भक्तिन्यस्त[3] नित्यकर्मे । शमादिक विप्रा कर्मे । भूपा शौर्य ।। ५ ।।

व्यापार वैश्या शूद्र सेवा । भर्तृसेवा स्त्रियां भवा । वारी वश्य करी देवा । भावाधीना ।। ६ ।।

भावाधीन देव खास । एतदर्थ इतिहास । प्रतिष्ठानीं[4] करी वास । कौशिकाख्य ।। ७ ।।

जातिमात्रें विप्र देह । नित्य सेवी वेश्यागेह । नेणे स्वस्त्री कृतोद्वाह५ । मोहग्रस्त ।। ८ ।।

ग्रस्त झाला महारोगें । शून्य झाली त्याची अंगें । त्याला वेश्या टाकी वेगें । दूर देशी ।। ९ ।।

स्मरे तेव्हां तो भार्येला । हळू हळू गेहीं आला । सती म्हणे दैवें आला । भला देव ।। १० ।।

दुर्गंध ये जरी त्यास । त्याचा वीट नसे तीस । अहोरात्र सेवी त्रास । न मानी ती ।। ११ ।।

नीती तिणें न लंघितां । क्षणोक्षणीं हाणीं लाता । तथापि ती त्याच्या चित्ता । शांत करी ।। १२ ।।

पूय[6]-मूत्र-मळ क्षाळी । तरी देतो नित्य गाळी । निजोनी तो एके वेळीं । वेश्या पाहे ।। १३ ।।

१. जगाच्या उत्पत्ति,स्थिति, विलयाला कारण. २. स्वभक्तांच्या इच्छामात्रें. ३. ईश्वरोद्देशानें समर्पित. ४. पैठणमध्यें. ५. विवाह केलेली स्त्री. ६. पूं-रक्त.

स्नेहें बोले तो भार्येला । वेश्यागेहीं नेयीं मला । ऐसें ऐकतांही तिला । झाला हर्ष ।। १४ ।।

वेश्येसाठीं भूषा[७] घेयी । धरी स्कंधीं धवा बायी । विद्युत्तेजें हळू पायीं । जाई ध्वांतीं ।। १५ ।।

चोरभ्रमें मांडव्यर्षी । शुळीं दिल्हा, विप्र त्यासी । लागे, म्हणे तो मरसी । सूर्योदयी ।। १६ ।।

न हो सूर्योदय ऐसी । सती बोले स्वकार्यासी । करोनी ये स्वगेहासी । तिसी भी तो ।। १७ ।।

ठः[८] ठः ठरें ठरें ऐसें । स्तंभनची होय जैसें । साध्वीवाचें सूर्या असे । तैसें स्थैर्य ।। १८ ।।

वषड्वश्य[९] करीं करीं । या मंत्रें जो वश्य करी । साहाय्य तो तिला हरी । करी वश्य ।। १९ ।।

न होतांची सूर्योदय । सर्वांलाही झाले भय । यज्ञलोपें देवां होय । एकादशी[९अ] ।। २० ।।

आम्हीं देतां सुवृष्टीसी । याजी[१०]ना जो त्या मर्त्यासी । पीडा द्यावी, परी यांसी । काळ नाही ।। २१ ।।

ऐसें बोलोनी ते देव ब्रह्म्यापाशीं घेती धांव । ब्रह्मा बोले लपे देव । साध्वीशापें ।। २२ ।।

तेजें तेजा शमवावें । अनसूयेपाशी जावें । ऐसें बोलोनी ते भावें । तेथे आले ।। २३ ।।

अत्रि-अनसूयेतें ते । विनवूनी पैठणातें । नेती सती बोले तीतें । माते धन्य ।। २४ ।।

पतीवीणें कांहीं तूज । नावडे कीं हितगुज । पती सर्वेश गे तूज । मज जेंवी ।। २५ ।।

स्त्रियां वेगळे न कर्म । पती देतो अर्धा धर्म । सुशीलत्वें लाभे शर्म[११]। पतिलोकीं ।। २६ ।।

येरी बोले हें यथार्थ । तुझें येणें हें किमर्थ । अनसूया बोले व्यर्थ । अनर्थ हा ।। २७ ।।

सूर्या बोलावीं तूं जरी । तुझा भर्ता मरे तरीं । वाचवीं हें रुचे जरीं । तरी करीं ।। २८ ।।

तथास्तु ती म्हणे सूर्या । ये बा ऐसें ऐकोनियां । आला सूर्य तो उदया । पडे[१२] विप्र ।। २९ ।।

७..भूषणें. ८. स्तंभनसूचक मंत्र. ९. वेश्या वश कशी झाली एतदर्थ सूचक मंत्र. ९अ. उपवास. १०. यज्ञ करीना. ११. सुख. १२. मरे.

**अनसूया वदे कांहीं । पतीवीणें न मी पाहीं । त्या धर्माच्या लेशें हाही । विप्र वांचो ।। ३० ।।**
**सव्याहृती[१३] बीजत्रय । उच्चारितां मृत्युंजय । मृताही ये जीव, होय । तैसें तेव्हां ।। ३१ ।।**
**अंतर्बाह्य त्याचा भाव । पालटला जेंवी देव । द्रांबीजानें[१४] चिरंजीव । जेंवी होतो ।। ३२ ।।**
**महानंद सर्वां झाला । अनसूये वर दिल्हा । त्रिमूर्ति ये त्वत्कुक्षीला । देववरें ।। ३३ ।।**
**देव गेले स्वस्थानासी । अनसूया त्या साध्वीसी । पुसोनी ये स्वगेहासी । अत्रीसह ।। ३४ ।।**
**अंतर्वत्नी[१५] वरें झाली । मार्गशीर्षी सायंकाळीं । पूर्णिमेसी प्रसवली । तीन पुत्र ।। ३५ ।।**
**सोम झाला ब्रह्मांशेंची । दत्तात्रेय विष्णू साची । दुर्वासा तो हरांशेंची[१६] । साध्वीधर्में ।। ३६ ।।**
**माखी न्हाणी पाजी त्यांतें। जो जो जो जो म्हणें ज्यांतें। गातां ठके वेद, त्यांतें। साध्वी पाळी।। ३७ ।।**
**सोम गेला चंद्रलोकीं । हिंडे दुर्वासा या लोकीं । पूर्ण दत्त त्रिमूर्ति कीं । गेहीं राहे ।। ३८ ।।**
**ध्यानमग्न, केव्हां नग्न, । उन्मत्तसा कीं उद्विग्न । दिसे लोकां ब्रह्मलग्न । नानारूपें ।। ३९ ।।**
**साध्य देव त्या नेणतां । बोलती कां वेदवार्ता । करीसी, आश्रम आतां । कोण तूझा ।। ४० ।।**
**दत्त बोले पांचवा पां । आश्रम हा असे सोपा । निर्विकल्पें स्वात्मरूपा । जो पाहे त्या ।। ४१ ।।**
**धैर्य सत्य शमें बुद्धी । धरा, छेदा ग्रंथी आधीं । समत्वें न द्वैत बाधी । साधी शांती ।। ४२ ।।**
**गर्वाक्रोश अवमान । द्रोह कामाद्यांचें भान । नसो न सोडा वाग्बाण । सोसा हेही ।। ४३ ।।**
**जैसा पट रंगे रंगी । तैसा होयी संगें संगी । साधुसंगें साधू अंगी । वेगीं बाणें ।। ४४ ।।**
**निंदा सोडा जोडा पाणी । परछिद्रा सोडा पाणी । बोला धर्म्या गोड वाणी । जाणीव घ्या ।। ४५ ।।**

१३. व्याहृतिसहित होंजूसः यांनीं संपुटित केलेला मृत्युंजय मंत्र. १४. याच्या अनुष्ठानानें. १५. गर्भिणी.  १६. शंकरांश.

**अवघ्याचें सार घ्यावें । हर्ष शोका दवडावें । ह्या आश्रमा तेव्हां पावे । भावें ऐशा ॥ ४६ ॥**
**ऐसें देवीं हें ऐकोनी । दत्ता परात्मा मानुनी । गेले त्या कालापासूनी । मौनी येती ॥ ४७ ॥**
**शिष्य होवूं पाहाती ते । डोहीं बुडी दिल्ही दत्तें । किती गेले, होते त्यांतें । पारखी तो ॥ ४८ ॥**
**वर घेवोनी स्वाश्रया । नग्न माया मद्य प्याया । दत्त बैसे देखोनियां । पळाले ते ॥ ४९ ॥**
**धर्मातिक्रम साहस । जिरे ईशा न मूढास । शिवाविना जेंवि वीष । जाळी अन्या ॥ ५० ॥**
**कार्तवीर्य तो टिकला । तोचि सम्राट मुक्त झाला । ऐका त्याच्या चरित्राला । पूर्वापार ॥ ५१ ॥**
**कृतवीर्य सोमवंशीं । पुत्रशोक झाला त्यासीं । गुरू[१७] सांगे सप्तमीसी । सूर्या अर्ची ॥ ५२ ॥**
**अपुत्रत्व, मौढ्य[१८], स्राव । कैसा होवो पुत्राभाव । व्रत दे सत्पुत्रभाव । भाव ठेवी ॥ ५३ ॥**
**सूर्य रुद्र सप्त माता । पूजीं होमीं ह्या देवता । चरू समिद्यवें ताता । आमी तिळें ॥ ५४ ॥**
**जीवत्पतिप्रजा नारीं । अभिषेकी तीच्या करीं । तेथें मंत्र हा उच्चारीं । वारी दोषा ॥ ५५ ॥**
**[१९]ग्रहर्क्षेंद्रदोष वारी । जीवत्पुत्रा हे हो नारी । कोणी बालातें न मारी । तारी हरी ॥ ५६ ॥**
**अभिषेक ऐसा होतां । तोषवी ते विप्रकांता । भोज्य दक्षिणा त्यां देतां । लाधे क्षेम ॥ ५७ ॥**
**दीर्घायू हा होवो बाल । त्रिमूर्ती ग्रह दिक्पाल । रिष्टहर्ते बहुसाल । पालक ते ॥ ५८ ॥**
**ऐसें ऐकोनी हें व्रत । राजा भावे आचरत । मैत्रेयी अनंतव्रत । तेंही सांगे ॥ ५९ ॥**
**एक वर्ष हविष्यान्न । पौर्णिमेसी तत्पूजन । तत्स्त्री शीलधरा दीन । पूर्ण करी ॥ ६० ॥**
**स्वप्नीं रूप दावी दत्त । होवोनियां अवधूत । बोले केलें पूर्ण व्रत । सुत घे हा ॥ ६१ ॥**

१७. बृहस्पती. १८. सल. (गर्भ न वाढतां शुष्क होणें). १९. हा अभिप्राय ज्यामध्यें अशा मंत्रानें.

माझा भक्त लक्षायू हा । चक्रवर्ती दुष्टारि हा । स्मर्तृगामी[२०] हो हा पहा । महाराज ॥ ६२ ॥
राज्ञी हर्षे झाली जागी । स्वप्न सांगे भूपा वेगीं । राजा बोले राही जागी । त्यागीं झोप[२१] ॥ ६३ ॥
दिक्पालांश गर्भी आला । मृद्‌भक्ष्याचा हो डोहाळा । करी राजा संस्कारांला[२२] । झालां हर्ष ॥ ६४ ॥
उच्चीं पांच ग्रह येत । कोणाचेंही नसे अस्त । तेव्हां राज्ञी हो प्रसूत । शांत काळीं ॥ ६५ ॥
जोशी सांगे झाला पुत्र । हो श्रीदत्तकृपापात्र । स्मर्तृगामी हा सर्वत्र । शस्त्रधारी ॥ ६६ ॥
वारी पापा तापा, नाम । याचें घेतां नष्टागम[२३] । शेखी पावे परंधाम । नामबळें ॥ ६७ ॥
राजा हर्षे करी धर्म । आत्मजाचें[२४] जातकर्म । म्हणे माझें झालें शर्म । ऋणमुक्ती ॥ ६८ ॥
अर्जुन हें नाम ठेवी । वाढे पुत्र चंद्र जेंवी । योग्य होतां व्रता[२५] सेवी । विद्या पढे ॥ ६९ ॥
कृतवीर्य दैवें मेला । न घे पुत्र तो राज्याला । सभेमध्यें तो सर्वांला । भला बोले ॥ ७० ॥
व्यापाराचा द्वादशांश । भूमीचाही घे षष्ठांश । परी रक्षीना जो त्यांस । खास चोर ॥ ७१ ॥
क्रोधें लोभें दंडी दंड्या। सोडी झोडी जो अदंड्या। यम त्याच्या फोडी हर्ड्या। मांड्या तोडी ॥ ७२ ॥
राजा जरी वागे न्यायें । भृत्य लुटती अन्यायें । राजा भोगी त्या अपायें । द्रुर्गतीतें ॥ ७३ ॥
भृत्यविश्वासें मी एक । कैसें वारूं एष्य[२६] दुःख । हें ऐकतां मुनी[२७] येक । ऐक म्हणे ॥ ७४ ॥
भूपा आराधी तूं दत्ता । निववील तो त्वच्चित्ता । त्वद्रूपाला अनेकता । तो दे योगी ॥ ७५ ॥
ज्याचें सह्यगिरि स्थान । माहुरीं करी शयन । नित्य भागीरथीस्नान । तुंगापान[२७अ] ॥ ७६ ॥

२०. स्मरण होतांच दर्शन देणारा. २१. पुनः झोंप घेतली तर स्वप्न निष्फळ होतें या अभिप्रायानें हें सांगणें. २२. पुसवनादि. २३. नष्टप्राप्ति. २४. पुत्राचें. २५. मौंजीबंधन. २६. पुढें येणारें. २७. गर्गाचार्य. २७अ. तुंगभद्रा नदींत.

कुरुक्षेत्रीं आचमन । क-हाडांत संध्या ध्यान । कोल्हापुरीं भिक्षाटन । नित्य करी ।। ७७ ।।

पंढरीसी विलेपन । सारापुरीं[२८] सुभोजन । स्मरतांची आगमन । शीघ्र करी ।। ७८ ।।

दत्तात्रेय अभिधान । अनसूयात्रिनंदन । ज्याच्या योगें देवगण । स्वर्गीं सुखी ।। ७९ ।।

जंभदैत्य स्वर्ग जेव्हां । घेयी, देवां मारी तेव्हां । गुरु सांगे सर्वां देवां । सेवा दत्ता ।। ८० ।।

मग देव घेती भेटी । माया[२९] दत्ताकंठी मिठी । घाली स्वयें टाळ्या पिटी । मद्या प्राशी ।। ८१ ।।

मारी देवां पळा म्हणे । नानापरी घाली भेणें । तथापी देव शहाणे । न पळती ।। ८२ ।।

ऐसें एक वर्ष गेलें । प्रेमें दत्त देवां बोले । देवीं सर्व निवेदिलें । झालें जें तें ।। ८३ ।।

दत्त बोले स्त्रीउच्छिष्ट । खातां झालों मी हा भ्रष्ट । माझा नसे जरी वीट । घ्या प्रसाद ।। ८४ ।।

शत्रू येथें आणा म्हणे । मग देव जाती क्षणें । दैत्यीं मारितां ते भेणें । आले, तेही[३०] ।। ८५ ।।

नारी दत्तांकीं देखिली । दैत्यीं भुलोनी घेतिली । दत्त बोले हानी झाली । यांची, मारा ।। ८६ ।।

परदाराकर्षणें[३१] ते । क्षीण झाले, देव त्यांतें । क्षणें मारोनी स्वर्गातें । घेते झाले ।। ८७ ।।

माया दत्तरूपीं लीन । झाली, ऐसें हें ऐकोन । त्वरें आला तो अर्जुन । दत्तापाशीं ।। ८८ ।।

तो हाणितां, धिक्कारितां । कर्म बीभत्स दावितां । न जायी, त्या दे उच्छिष्टा । तें तो खायी ।। ८९ ।।

तेव्हां गेले भुज त्याचे । दत्त बोले संसर्गाचें । फळ हें, जा येरू त्याचे । पाय धरी ।। ९० ।।

दत्त बोले सम्राट हो तूं । सर्वैश्वर्य गती घे तूं । सर्वज्ञ अजिंक्य हो तूं । धर्मीं योगी ।। ९१ ।।

सहस्त्रबाहूपाळक । रूपें धरसी अनेक । स्मर्तृगामी, दुर्वारक[३२] । नष्टदाता ।। ९२ ।।

२८. पांचाळेश्वर. २९. देवांला भूल देण्यासाठीं मायेनें निर्माण केलेली स्त्री. ३०. दैत्यही. ३१.परस्त्री. ३२. कष्ट किंवा निषिद्ध वारणारा.
३३. किल्ले. ३४. दत्तात्रेयांसारखा. ३५. आकाशपाताळीं.

**दत्ताज्ञें तो राज्यीं आला । अभिषेक देवें केला । तेव्हां बोले तो सर्वांला । ऐका आज्ञा ॥ ९३ ॥**
**एकला मी राज्य करीं । न दें कोणाला चाकरी । हानी होतां जो जो स्मरे । ये मी तेथें ॥ ९४ ॥**
**माझ्याविना जो शस्त्रातें । धरी पाप करी त्यातें । दंडी, ऐशा तदाज्ञे ते । भीते झाले ॥ ९५ ॥**
**राष्ट्र दुर्ग[33] मार्ग सेना । पशु क्षेत्र धान्य धना । राखी रूपें घे तो नाना । ज्ञानाब्धीसा[34] ॥ ९६ ॥**
**भूमि स्वर्गीं ख[35] पाताळीं । राजा धुंडे सर्वकाळीं । स्मरतांची त्या जवळी । धांव घेतो ॥ ९७ ॥**
**ऐसा बळी तो ऐकोनी । आला रावण धांवोनी । स्त्रीयां करीं त्या बांधोनी । दे पोरांते ॥ ९८ ॥**
**कुबेरें तो सोडविला । सहस्त्रार्जुन नामाला । ऐशा परी तो पावला । झाला भला ॥ ९९ ॥**
**प्रतिदिनीं घे दर्शन । दत्ताचें नित्य स्मरण । दशसहस्त्र हो यज्ञ । त्याणें केले ॥ १०० ॥**

**इति श्रीदत्तलीलामृताब्धौ दत्तावतारपूर्वकार्जुनानुग्रहसंज्ञा**
**प्रथमलहरी समाप्ता ओव्या १०० ॥ अक्षरें २८०० ॥**

३३. किल्ले. ३४. दत्तात्रेयासारखा. ३५. आकाश.

## ।। लहरी २।।

### श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।।

[१]असा राजा राज्य करीं । त्या ये वैराग्यलहरी । राज्य टांकी दूरी धरीं । ज्ञानाब्धीतें ।। १ ।।
ज्ञानाब्धी श्रीदत्तात्रेय । राजा येतां मौनी होय । उभा राजा चिंती पाय । अपायघ्न[२] ।। २ ।।
ऐसे किती दिन गेले । दत्तें ध्यान न सोडीलें । भूपें स्तवा आरंभिलें । भ्याले मन ।। ३ ।।
येती देवर्षी प्रभातीं[३] । नित्य वंदूनि ते जाती । शांततपा कुंडी[४] हातीं । धरी राहे ।। ४ ।।
एके दिनीं उठे दत्त । कुंडी घेयी शौचा जात । यथाविधी होतां पूत[५] । शिष्य आला ।। ५ ।।
त्यांणे सामग्री[६] दीधली । दत्तें नित्य क्रिया केली । धारणा[७] ही आरंभिली । पैली जैसी ।। ६ ।।
शिष्य म्हणे राजा येथ । प्रायोपवेशनें[८] त्रस्त । देतों अणी इच्छी वित्त । दत्त म्हणे ।। ७ ।।
राजा वदे पुरे आतां । परीक्षा हे गुरूनाथा । ज्ञानाविना नसे आस्था । आतां मला ।। ८ ।।
मृत्यु माझा आज्ञाधार । देव माझे अनुचर । रिद्धिसिद्धिचें मी घर । हें त्वां केलें ।। ९ ।।
राज्यलक्ष्मी पुत्र नारी । आप्त होती अंतीं दूरी । नको वार्ता यांची हरी । तारी शिष्या ।। १० ।।
शास्त्रें झाला मला भ्रम । प्रत्येकाचें भिन्न वर्म । दत्त बोले एक धर्म । सर्वशास्त्री ।। ११ ।।
क्षुद्र[९] शास्त्रें पढवितां । इंद्रे गुरूला पूसतां । तो त्या सांगे सात गाथा[१०] । ह्या त्या ऐक ।। १२ ।।
एक शिल्पी शास्त्राधारें । बांधी देवालयें घरें । दान धर्म तेथें बरे । नित्य होती ।। १३ ।।

ॐकाराचा पहिला अवयव. २. अपाय दूर करणारे. ३. प्रातःकाळीं. ४. कमंडलु. ५. पवित्र. ६. मृत्तिकादि. ७. योगधारणा. ८. उपोषणानें. ९. अल्प. १०. कथा.

आधि[११]व्याधी कोणा नोहे । ऐसें त्याचें कौशल्य हें । रुचे सर्वां धन लाहे । वाहे धर्मी ।। १४ ।।
मरोनी घे स्वर्गसुख । पुढें राजा तो धार्मिक । पुनः झाला विप्र चोख । ब्रह्मनिष्ठ ।। १५ ।।
एक विप्र स्मारशास्त्री[१२] । जगीं धुंडे शास्त्रोक्त स्त्री । एका राये कांता[१३] पुत्री । त्या दाविली ।। १६ ।।
आली तेव्हां त्याला मूर्च्छा । कन्या करी त्याची इच्छा । राजा तैसी त्यांची वांच्छा । पूर्ण करी ।। १७ ।।
राज्यार्धेंशी कन्या देयी । खुशी झाला तो जांवयी । स्माररंगें, रंगी घेयी । तीशीं भोग ।। १८ ।।
नरादिब्रह्मांतानंद[१४] । रतीं ते घे प्राज्ञ मंद । ते नेणें तो अंतीं खेद । घे न शांती ।। १९ ।।
कलईं[१५] संयोगें ह्याला । मोहीं मोहीं म्हणे ज्याला । ये अन्योन्या मोह, आला । यांला तैसा ।। २० ।।
अंतरतां होती कष्टी । परस्परां एक दृष्टी । होती आनंदाच्या गोष्टी । पोटीं प्रेम ।। २१ ।।
ऐशा आनंदें तो मेला । सस्त्रीक गंधर्व झाला । तेणें शंभू तोषविला । ख्याला गातां ।। २२ ।।
शिवें ब्रह्मलोका नेला । तेथें घे क्रममुक्तीला[१६] । तेव्हां दोष या शास्त्राला । आला कैसा ।। २३ ।।
वेदशर्मा गोदावासी । शांत दांत सुत त्यासी । होता, सात भूतें त्यासी । ग्रासीयेला ।। २४ ।।
पडे रडे उडे हंसे । खायी गाई न्हायी असे । सात भाव करीतसे । पिसेपणें ।। २५ ।।
नाना उपाय योजिले । भूत एकही न गेलें । एके दिनीं भिक्षू[१७] आले । दुर्गंधांगी ।। २६ ।।
विप्र भिक्षा देतां छबी[१८] । त्याची देखे जेंवी रवी । पळे भिक्षू विप्र जवी[१९] । धावे पाठीं ।। २७ ।।
मार गाळी सोसी जेव्हां । दत्त दावी रूप तेव्हां । विप्र वदे पुत्राला व्हा । प्राणदाते ।। २८ ।।
दत्त सात मंत्र सांगें । रोज एक एक सांगें[२०] । त्याच्या कानीं ह्यानीं वेगें । भूतें जाती ।। २९ ।।

११. मानसिक दुःख. १२. कामशास्त्री. १३. सुंदर. १४. मनुष्यापासून ब्रह्मानंदापर्यंत. १५. क्लीं बीजानें. १६. मुक्ती चार- सलोकता, सरूपता, समीपता आणि सायुज्यता. १७. अवधूत. १८. कांति. १९. वेगानें. २०. अंगोपांगांसह.

**ऐसें सांगोनी हो गुप्त । विप्रें तैसें केलें व्यक्त । रोज रोज एक तप्त । भूत गेलें ।। ३० ।।**

**एका एका योगें जसे । मनोमल[२१] जाती तसे । जो जो जाई त्याची नसे । ती ती चेष्टा ।। ३१ ।।**

**फट्कारानें उच्चाटितां । राक्षस ही हो धांवता । भूताद्याची कैंची वार्ता । उच्चाटनें ।। ३२ ।।**

**पुत्र झाला पूर्ववत । अभ्यासें हो जीवन्मुक्त । मंत्रशास्त्रें साधनांत । हीत हें हो ।। ३३ ।।**

**मातापुरीं विष्णुदत्त । करी कर्म मीमांसोक्त[२२] । त्याचे अंगणीं अश्वत्थ । गुप्त[२३] असे ।। ३४ ।।**

**ब्रह्मराक्षस त्या वृक्षीं । विप्रदत्त बळी२४ भक्षी । न देती जे त्यां तो शिक्षी । रक्षी विप्रा ।। ३५ ।।**

**शुद्धान्ने ये त्या शांतता । वर दे तो विष्णुदत्ता । भार्यामतें मागे, दत्ता । दावीं ऐसें ।। ३६ ।।**

**बोले राक्षस हें जरी । मला साक्षात् नोहे तरीं । दूरी दावीं स्वार्थ करी । फेरी[२५] वारी ।। ३७ ।।**

**एके दिनीं विप्रा भूत । दावी मद्यापणीं[२६] दत्त । विप्र पाहे म्हणे मत्त । दत्त न हा ।। ३८ ।।**

**गुप्त झाला तो तात्काळ । विप्र ताडी स्वकपाळ । भूत बोले दोन वेळ । दावीं पुनः ।। ३९ ।।**

**भूत बोले एके दिनीं । आहे दत्त तो स्मशानीं । विप्र गेला तेथें, हाणी । त्यातें दत्त ।। ४० ।।**

**मागें होतां दत्त गुप्त । झाला विप्रा वदे भूत । पुनः दावीं हो तूं सक्त[२७] । पदीं धैर्ये ।। ४१ ।।**

**पुनः दावी एके दिनीं । कुत्र्यां काकां दे छेदूनी । खरमांस[२८] त्या जावूनी । दत्ता पाहें ।। ४२ ।।**

**पुसे काय कार्य तरी । सांगे श्राद्धीं क्षण करीं । तरोनी तूं मला तारीं । वारीं भवा ।। ४३ ।।**

**पत्नी बोले व्हा सादर । विप्र म्हणे सोडीं दर[२९] । जांता दत्तपदीं फार । मार दे त्या ।। ४४ ।।**

**वदे दत्त सोडीं पाद । तो बोले पुरवीं छंद[३०] । क्षण[३१] घेयी दर्शश्राद्धा । सिद्ध करीं ।। ४५ ।।**

२१. रागद्वेषादि. २२. मीमासाशास्त्राप्रमाणें किंवा सुविचारानें. २३. राखलेला. २४. भूतबळी. २५. जन्ममरण. २६. मद्य विकणाऱ्याचे दुकानीं. २७. आसक्त. २८. गाढवाचें. २९. भय. ३०. अभिलाष. ३१. आमंत्रण.

दत्त म्हणे नष्ट भ्रष्ट । मी अस्पृष्ट तूं रे शिष्ट । विप्र म्हणे ब्रह्मनिष्ठ । वरिष्ठ तूं ॥ ४६ ॥
दत्त रूप दावी, होती । श्वान काक श्रुतिस्मृती । वदे विप्र माझी मुक्ती । होती झाली ॥ ४७ ॥
दत्त बोले मी यें, विप्र । पंक्तियोग्य सांगे क्षिप्र[३२] । तेव्हां ये तो, हर्षें विप्र । सांगे भूता ॥ ४८ ॥
भूत बोले सूर्याग्नीतें । योजीं, तोही घरीं स्त्रीतें । सर्व सांगे ती, पाकातें । शीघ्र करी ॥ ४९ ॥
अन्नपूर्णा ज्याच्यापाशीं । तो श्रीदत्त ये त्यापाशीं । सरसान्नाची[३३] हो राशी । दासी सिद्धीं ॥ ५० ॥
येवोनी श्रीदत्त बोले । विप्र अद्यापी न आले । पत्नी आसन दे, बोले । बैसा येती ॥ ५१ ॥
ये ती बाहेर प्रार्थुनी । बा हे सूर्या, तो घेऊनी । विप्ररूपा, त्या आसनीं । बैसवी ती ॥ ५२ ॥
दत्त वदे देवस्थानीं । कोण विप्र, तें ऐकुनी । प्रार्थी अग्नीतें येवूनी । तोही बैसे ॥ ५३ ॥
मग सांग श्राद्ध केलें । सर्व देव तृप्त झाले । पितरही मोक्षा गेले । बोले विप्र ॥ ५४ ॥
ब्रह्मराक्षसोपदेशें । झालें दर्शन हें असें । दत्ता ध्यान मनीं ठसे । ऐसें करी ॥ ५५ ॥
दत्त वदे मी त्वच्चित्ता । न सोडीं, दे मदुच्छिष्टा । भूता, तो, तू, स्त्रीही आतां । मुक्तता घ्या ॥ ५६ ॥
दत्त विद्या सूर्य यान[३४] । अग्नी सिध्दी दे, ते तीन । गुप्त झाले, धरी ध्यान । ब्राह्मण तो ॥ ५७ ॥
उच्छिष्टें हो भूत मुक्त । विप्र झाला प्रेष्ठ[३५] भक्त । आचरितां मीमांसोक्त । मुक्त हो कीं ॥ ५८ ॥
गोदातीरीं हरिशर्मा । विशीं[३६] भोगी पूर्वकर्मा । देवद्रोहें सहगुल्मा । जल्मा आला ॥ ५९ ॥
त्यांत क्षय द्वादशाब्दीं । ब्रह्मघातें षोडशाब्दीं । जलोदर पुढें त्र्यब्दीं । जीर्णज्वर ॥ ६० ॥
हो षण्मासें अतिसार । चौं मासानें भगंदर । त्रिदोष शेखीं[३७] थोर । मारक जो ॥ ६१ ॥
तत्स्त्री जायी विष्णुदत्ता । शरण तो प्रायश्चित्ता । योजी कर्मविपाकोक्ता । स्त्रीकरवीं ॥ ६२ ॥

३२. सत्वर. ३३. षड्रसांसहित अन्नाची. ३४. वाहन. ३५. श्रेष्ठ. ३६.जन्मापासून वीस वर्षांमध्यें. ३७. शेवटीं.

जों जों प्रायश्चित्त होत । रोग तों तों होयीं नष्ट । त्रिदोषा वैद्यशास्त्रोक्त । मात्रा पाजी ।। ६३ ।।
विप्र झाला रोगमुक्त । मंत्र दे त्या विष्णुदत्त । त्याणें विप्र झाला सक्त । दत्तपदीं ।। ६४ ।।
रोग जातां पुष्टी रसें । माया जातां ज्ञानें तसें । श्रेय[३८] तदर्थ हें असे । शास्त्रोपाय ।। ६५ ।।
एक माता, रोग होतां । निंब पाजी निजसुता । तो न पिये, लाडू देतां । पीता झाला ।। ६६ ।।
तैसी फलश्रुती[३९] गौण । हें जाणे त्या ज्ञान पूर्ण । बाणें, नेणें त्या भ्रमण । ये शास्त्रार्थी ।। ६७ ।।
लोकां प्रवृत्ती हो लाडू । भासे निवृत्ती ती कडू । आर्ता दावी फळ लाडू । श्रुतिमाता ।। ६८ ।।
जगीं किंवा स्वर्गीं भोग । प्रयोग कीं शत्रू भंग । करावया हें शास्त्रांग । सांग कसें ।। ६९ ।।
एक देवदत्त देशीं। जातां मागें तत्स्त्रीपाशी। घेवोनी पतिरूपासी। झोटींग४० ये ।। ७० ।।
म्हणे जाणें ज्या कार्यासी । तो भेटला वेशीपाशीं । परतलों मी शीघ्रेंशी । प्राणप्रिये ।। ७१ ।।
अशी तिशीं घाली भूली । भार्या सत्य समजली । भोग देतां ती भागली । आली शंका ।। ७२ ।।
मोठी त्याची भोगशक्ती । पोटीं ठेवी लाजेने ती । दाटी शोकें, तो मासांती । पती आला ।। ७३ ।।
पिसा[४१] म्हणे त्या तूं कोण । विप्र म्हणे मी ब्राह्मण । माझे घरी तू रे कोण । मद्रूपानें ।। ७४ ।।
तो म्हणे मी घरधनी । कपटी तूं जा येथूनी । ते ऐकोनी विप्र हाणी । तोही त्यातें ।। ७५ ।।
ग्रामीं लोकां झाला खेद । त्यांच्या रूपा नसे भेद । विष्णुदत्तापाशीं वाद । तोडूं चला ।। ७६ ।।
म्हणोनी ते तेथें आले । विष्णुदत्त त्यातें बोले । तुल्यरूप दोघां भलें । तुल्यध्वनी[४२] ।। ७७ ।।
एक सत्य एक धूर्त । दावील हें आतां दत्त । विप्रा श्वेत भूत रक्त । रेखी मुद्रा ।। ७८ ।।
पुसे एका एका भिन्न । घर वस्त्र धन धान्य । स्त्रीचें लक्षण सामान्य । सांगे विप्र ।। ७९ ।।

३८. मोक्ष. ३९. कर्माचें फळ. ४०. ब्रह्मचर्याश्रमीं कामार्त होऊन जो मरतो तो झोटिंग (भूत) होतो. ४१. झोटिंग. ४२. बोलणें.

इटा कौलें वासे धन । कणसंख्या, पात्रमान । स्त्रीचें बाह्यांतर्लक्षण । भूत सांगे ॥ ८० ॥
तो संशय लोकां झाला । विप्र म्हणे या क्षेत्राला । फिरोनी ये पूर्वी त्याला । सत्य मानूं ॥ ८१ ॥
क्षणें भूत ये दे खूण । विप्रा लागे अर्धा दिन, । म्हणे त्यांतें सांगा खूण । ह्या नगाची[४३] ॥ ८२ ॥
विप्र षड्यामें[४४] ये, भूत । यामार्धे[४५], लोक म्हणत । नर नोहे हाची भूत, । विप्र म्हणे ॥ ८३ ॥
या कुंडीच्या तोटींतून । ये तो घे स्त्री हें ऐकून । रिघे भूत तद्‌बंधन । विप्र करी ॥ ८४ ॥
ॐ[४६] हुं फट् भो महा वीरा । भूता बांधीं बांधीं वरा । भूमीतळीं गाडी वरा । शिळा ठेवी ॥ ८५ ॥
लोकां म्हणे विष्णुदत्त येतां। ओळखिला भूत । खात्री व्हाया क्रम येथ । हा दावीला ॥ ८६ ॥
सर्वां झाला महानंद । ऐसा शास्त्रें जातां खेद । लाभे खरा परानंद । भेद नुरे ॥ ८७ ॥
एका विप्रा झाला सुत । पूर्वीचा तो योगभ्रष्ट । उन्मत्तसा तो वर्तत । संगभयें ॥ ८८ ॥
मोठा होतांही तो नेणें । मळ-मूत्र खाणेंपिणें । कोणी म्हणें भूतभेणें । ऐसा हो कीं ॥ ८९ ॥
सर्वोपाय तातें केले । ते ते सर्व वायां गेले । विष्णुदत्तापाशीं नेलें । त्या बाळातें ॥ ९० ॥
त्याणें ज्ञानी ओळखिला। लोकां म्हणे तुम्ही चला। बोले त्याला कां ह्या लीला। मुला केल्या ॥ ९१ ॥
कोणाचा तूं कोठें जासी । वाटे भय मोठें घेसी । आई-बापा कां न देसी । पुत्रसूख ॥ ९२ ॥
बाळ वदे हा एकला । सबाह्यांतरीं भरला । जाणें येणें नसे ह्याला। संबंधही ॥ ९३ ॥
भक्त वदे सत्य हेंची । तरी भीती कां संगांची । चेष्टेपरी घे लोकांची । राहाटी तूं ॥ ९४ ॥
घरीं जारिणी वावरे । तिचें चित्त जारीं ठरे । ज्ञाता तेवीं क्रिया चरे । ब्रह्मीं लीन ॥ ९५ ॥
यांत त्याचा नसे तोटा । उपकार आणी चेष्टा । दोनी लाभे ब्रह्मनिष्ठा । नीति शास्त्रें ॥ ९६ ॥

४३. पर्वताची. ४४. सहा प्रहर. ४५. चार घटकांनीं. ४६. ह्या अभिप्रायाच्या बंधन मंत्रानें.

मग बाळ सोडी खोडी । ब्राह्मणी त्या जेवूं वाडी । अन्न खातां तें दे दडी । भीती त्याची ।। ९७ ।।
पिता पाहे शांत सुता । म्हणे घालविलें भूता । वंदुनी ते विष्णुदत्ता । जाती घरा ।। ९८ ।।
भ्रममात्र हा संसार । यांत शास्त्रें मिळे सार । सारें भवपारावार । पार होई ।। ९९ ।।
शास्त्रैक्यार्थ सात गाथा । गुरू सांगे देवनाथा । मग दत्तपदीं माथा । राव ठेवी ।। १०० ।।

इति श्रीदत्तलीलामृताब्धौ सप्तगाथाख्या द्वितीयलहरी संपूर्णा । ओव्या ।। २०० ।।

## ।। लहरी ३ ।।

### ।। श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।।

उ[1]पदेश गुरू सांगे । ह्या जो शिष्य घे षड्लिंगें[2] । तोच भक्त लोटी वेगें । मागें भवा ।। १ ।।
भवातीत[3] निर्विकार । विभू आद्य अज पर । मायायोगें हो साकार । एक आत्मा ।। २ ।।
स्वयें मायाऽविद्या हो तो । ईशा जीवा आभासें[4] तो । करी सत्य हें माने तो । होतो बद्ध ।। ३ ।।
त्रिगुणमायायुक्तात्मा । त्यापासूनी जन्म व्योमा[5] । वाताग्नी आप भू जन्मा । क्रमें देतो ।। ४ ।।
शब्दस्पर्श रूपरस । गंध एकोत्तर त्यांस । गुण दिल्हे या पांचांस । घे तो बद्ध ।। ५ ।।
पंचीकृत भूतयोगें । देह झाले हे अवघे । स्वस्वाधिक्यें देह वागे । स्वस्वाधीन[6] ।। ६ ।।
भूतसत्वांशें वेगळीं । ज्ञानेंद्रियें पांच झालीं । अंतःकरणाते व्याली । सत्त्वैकता ।। ७ ।।
रजोंशानीं कर्मेंद्रियें । प्राणा जन्म तदैक्यें ये । यांही लिंगदेहाला ये । आकारता ।। ८ ।।
दिग्वातार्क वरुणाश्वी । ज्ञानेंद्रियें राहे तेवीं । अग्नींद्राज मृत्यू कवी[7] । कर्मेंद्रिया ।। ९ ।।
धीचा जीव मना चंद्र । चित्ताधीश हो उपेंद्र । अहंकारपती रुद्र । चालक हे ।। १० ।।
व्यष्टीचें[8], हे होत देव । समष्टीचे[9] अवयव । यांचा चालक तो देव । स्वयंज्योती ।। ११ ।।
पंचीकृत स्थूळमूर्ती । तेथें विश्व घे जागृती । लिंगीं तैजस घे भ्रांती । स्वप्नाची हे ।। १२ ।।
अविद्या कारणदेह । तेथें प्राज्ञा निद्रा मोह । याचा साक्षी तुर्य न हो । संदेह[10] ज्या ।। १३ ।।

१. ॐकाराचा द्वितीय वर्ण. (उ पदाचा ईश शंकर तो गुरू असाही अर्थ करावा.) २. सहा शास्त्रें. ३. संसारधर्माहून वेगळा. ४. प्रतिबिम्बानें. ५.आकाशाचा. ६. ज्या भूताचा अधिक अंश जाया शरीरामध्यें तें शरीर त्या भूताच्या स्वाधीन राहतें. ७. ब्रह्मा. ८. निरनिराळ्या देहाचे. ९. विराटाचे. १०. संशय.

**स्थूळ अन्नमयकोश । त्याचा जीवा जैं अध्यास । तेणें घे षड्विकारांस । भास हाही ।। १४ ।।**

**कर्मेंद्रियप्राणसंगें । नित्य भूक तहान घे । ज्ञानेंद्रिय मनें उगें । भ्रम करी ।। १५ ।।**

**ज्ञानेंद्रियबुद्धियोगें । कर्तृत्वाच्या लेपें फुगे । प्रिय[११] मोद[१२] प्रमोदें[१३] घे । भोक्तृत्व हा ।। १६ ।।**

**जेव्हां होयी देहातीत । पंचकोशव्यतिरिक्त । दशासाक्षी[१४] तेव्हां मुक्त । भक्त हो तो ।। १७ ।।**

**ऐसा होण्यासाठीं योग । अभ्यासावा हा अष्टांग । निर्वासन मनोभंग । चांग होई ।। १८ ।।**

**खोटें बोलों नये, चोरी । हिंसा दुर्मैथुन[१५] वारी । सरळतां धैर्य धरीं । दुःख होतां ।। १९ ।।**

**सर्वांवरी कृपा करीं । मृत्तोयानें शोच करीं । अवमानीं क्षमा धरीं । खाई सूक्ष्म[१६] ।। २० ।।**

**यांचे नाम दहा यम । दाहा हे ऐक नियम । जपे देवगुरू नाम । देवां पूजीं ।। २१ ।।**

**वेदांताचा नित्याभ्यास । गुरूवाक्याचा विश्वास । कृच्छ्रें[१७] शोषीं स्वदेहास । कर्मीं श्रद्धा ।। २२ ।।**

**दैवलाभें संतोषोन । पात्रीं देईं शक्त्या दान । निंद्या लाजे, विष्ण्वर्पण । सर्व करीं ।। २३ ।।**

**उज्वा डावे मांडीवरी । डावा पाद उज्वेवरी । पृष्ठहस्तीं व्यस्त धरी । पादांगुष्ठा ।। २४ ।।**

**नासाग्राक्ष[१८] सिधा बैसें । बद्धपद्मासन असें । किंवा सिद्धासनीं बैसें । भ्रूमध्याक्ष ।। २५ ।।**

**डावी खोंट गुदावरी । तयावरी उज्वी धरीं । नमी[१९], हनूं उरीं धरीं । हेंचि सिद्ध ।। २६ ।।**

**दर्भ-चर्म-वस्त्रावरी । ऐसा बैसें तूं एकाग्रीं । जलाग्न्यादी भीती दूरी । करीं पूर्वी ।। २७ ।।**

**घेयीं डावे नासापुटीं । सोळा अंकें वायू पोटीं । चतुर्गुणें घे हन्वटी । खाली धरीं ।। २८ ।।**

११. आवडत्या वस्तूचें दर्शन. १२. त्याचा लाभ. १३. त्याचा अनुभव. १४. जागृदादि अवस्था. १५. शास्त्रनिषिद्ध मैथुन न करणें हें गृहस्थास उद्देशूनच समजावें. १६. पोटाचे दोन भाग अन्न व एक भाग जळानें भरून चौथा रिता ठेवणें. १७. चांद्रायणादिक. १८. नासिकाग्रावर दृष्टी. १९.नमस्कार करी किंवा हनुवट नम्र करी.

दुजा नासापुटें सोडी । बत्तीसांनीं पुनः ओढी । विपरीत शुद्ध नाडी । हो अभ्यासें ॥ २९ ॥
तीन वेळ वीस वीस । वाढवावें कुंभकास । ऐसें करीं तीन मास । खास सिद्धी ॥ ३० ॥
कनिष्ठानें[२०] घर्म येतो । मध्यमें देह कांपतो । ब्रह्मरंध्रीं प्राण जातो । उत्तमानें ॥ ३१ ॥
दों पळें पांच विपळें । होतो प्राणायाम बळें । तो उत्तम त्याणें ढळे । कुंडलिनी ॥ ३२ ॥
पंचवीस पळें ठरे । तेव्हां प्रत्याहारें नुरे । बाह्यभान धारणारे । दोंघडीनें[२१] ॥ ३३ ॥
अहोरात्रें घडो ध्यान । करीं निद्रा निवारण । विक्षेपा[२२] दे प्रशमन । रस नेघें ॥ ३४ ॥
श्रवणाचें हे मनन । आंत युक्तीनें सेवन । स्वप्नवत् द्वैतभान । मान मिथ्या ॥ ३५ ॥
तो मी साक्षी परिपूर्ण । ऐसें नित्य करीं ध्यान । ध्येयाकार होतां मन । समाधी हो ॥ ३६ ॥
आदर्शस्थमुखें भान । मुखाचें हो तेवीं जाण । बुद्धिप्रतिबिंबें भान । हो स्वात्म्याला ॥ ३७ ॥
चित्तेंद्रियें न दाविती । स्वात्म्या तो घे स्वप्रतीती । वृत्तिज्ञानें तेंही अंतीं । रूपीं मुरे ॥ ३८ ॥
कतकरजोन्यायानें[२३] । ज्ञान मुरतां तत्क्षणें । फुरे स्वात्मा एकपणें । पूर्णानंद ॥ ३९ ॥
निद्रेमाजी जरीं ऐसें । तेथें वृत्तिज्ञान नसे । सामान्याशीं वैर नसे । अज्ञानाचें ॥ ४० ॥
सूर्यतेजें जेंवी तृणें । न जळती संयोगानें । सूर्यकांताच्या तत्क्षणें । भस्म होती ॥ ४१ ॥
तैसें वृत्तिज्ञान जाणा । जहदजहल्लक्षणा[२४] । तत्वंपदार्थैक्य[२५] खुणा । दावी खास ॥ ४२ ॥
धरी जेव्हां योगीं चाड । तेव्हां सिद्धी येती आड । योगा घालिती बिघड । द्वार त्या रे ॥ ४३ ॥
अणिमादी आठ सिद्धि । दाहा अन्य उपसिद्धी । येथें न धरावी बुद्धी । नश्वर ह्या ॥ ४४ ॥

२०. कनिष्ठ प्राणायामानें. २१. पांच घटिकांनीं. २२. विषयांतर. २३. निवळीची बीं. २४. विरुद्ध टाकून अविरुद्ध घेणेची लक्षणा. २५.जीवब्रह्मैक्यत्वाचा.

**धरिती त्या जरी कास । त्यांची न ठेवावी आस । ऐसा नर करी त्यास । खास मोक्ष ।। ४५ ।।**
**योगभ्रष्ट झाला तरी । तो मोक्ष घे जन्मांतरीं । प्रभाव हा योगोदरीं । तारी साच ।। ४६ ।।**
**क्रममुक्ती ब्रह्मलोकीं । ब्रह्म्याबरोबर ये कीं । अप्रतिबद्धा[२६] या लोकीं । जीवन्मुक्ती ।। ४७ ।।**
**ज्ञानी तदर्थ उपाय । करिती, ते सर्वापाय । निवारिती, तूं ही सोय । घरीं अंगें ।। ४८ ।।**
**अर्था[२७] भुलेना जो ज्ञाता । मुग्ध तो जो मार्गी जातां । न दे दृष्टी इतस्तता । आधंळा तो ।। ४९ ।।**
**निंदा स्तुती न घे कानीं । भेरा तो, मितसद्वाणी[२८] । बोले, स्वादा दे सोडूनी । अजिह्व तो ।। ५० ।।**
**भिक्षा शौचार्थ जो जाई । पंगू तो, जो कशी बाई । पाहूनी न भुली घेई । तोची षंढ ।। ५१ ।।**
**ऐसा वागे त्या ये सिद्धी । तूंही ऐसा योग साधीं । गुहा ही घे, येथें आधी । कधीं न हो ।। ५२ ।।**
**ठेवी दत्त शिरीं हात । राजा वंदी, जाई तेथ । तीन दिन हो ध्यानस्थ । प्रसादानें ।। ५३ ।।**
**पुनः ही हो बारा दिन । समाधिस्थ मास तीन । पुसे त्याला उठवून । दत्तात्रेय ।। ५४ ।।**
**म्हणे बोले अनुभव । बोले राजा जेथें वाव । त्रिपुटीला[२९] नसे ठाव । वृत्तिज्ञाना ।। ५५ ।।**
**होतों तेथें समाहित । जाणीलें हें मीं उठतां । पूर्वाभ्यासानुवृत्तिता[३०] । तर्किजे ते ।। ५६ ।।**
**तो आनंद कैसा कोण । वदे दैवें ज्या सोडोन । आलों येथें घे चरण । हे ही तैसे ।। ५७ ।।**
**दत्त हसोनी जेववी । पुनः अभ्यासा पाठवी । वर्ष होतां त्या ऊठवी । स्वयें दत्त ।। ५८ ।।**
**दत्त बोले तूं कृतार्थ । करीं राज्य भोगीं अर्थ । जरी नसे तुला स्वार्थ । तरी जा रे ।। ५९ ।।**
**निज प्रारब्ध भोगावें । अनासक्तीनें वागावें । सदा स्वरूपीं जागावें । गावें देवा ।। ६० ।।**

२६. ज्याच्या ज्ञानाला विघ्न न आलें त्याला. २७. द्रव्याला. २८. थोडें व सुरस बोलणें. २९. ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय. ३०. समाधीपूर्वी अभ्यासानें आलेली वृत्ति पुढें येते ती अनुवृत्ती.

**लोकबाधानिरासार्थ । लोकां दावीं विपरीत । भावें धरीं ह्रदयांत । नित्य धर्म ॥ ६१ ॥**

**वर्म ऐसें सांगे दत्त । राजा शिरीं धरी जात । राष्ट्रीं तैसें आचरत । दत्ता स्मरे ॥ ६२ ॥**

**करी विप्रोद्वाह[३१], बांधी । तळीं, धन अश्वमेधीं । वेंची, ज्याच्या राष्ट्रीं आधी । व्याधी नसे ॥ ६३ ॥**

**स्वयें पाळी सप्तद्वीपा । स्मरे जो त्या दावी रूपा । अनेकत्व ये तद्रूपा । दीपा जेंवी ॥ ६४ ॥**

**तेव्हां सर्व सुवासिनी । वृद्ध होती सर्व प्राणी । ईतिभीती[३२] नेणें कोणीं । आणी नैस्व्य[३३] ॥ ६५ ॥**

**खें खें मारीं मारी अरी[३४] । अशा जपें हो त्या परी । नामें कार्तवीर्य मारी । अरि चोरां ॥ ६६ ॥**

**स्वाहा शमवीं शमवीं । ह्याचेपरी पराभवी । बाधा[३५] दोष रोष देवी । कार्तवीर्य ॥ ६७ ॥**

**पर्जन्येंद्र ऋष्यशृंग । मंडूक दे मंत्रें चांग । वृष्टी तेवीं दे अव्यंग । अर्जुनाख्या ॥ ६८ ॥**

**उमा३६ रमा-सरस्वती । ऋद्धिसिद्धी बुद्धि देती । कार्तवीर्यनामें हातीं । येती तीन्ही ॥ ६९ ॥**

**ऐसा राजा तो एकदा । भुजीं वळवीं नर्मदा । कांता खेळवी नर्मदा[३७] । मदांधसा ॥ ७० ॥**

**कोपें सिंधू ये धावूनी । राजा लोटी त्या ताडूनी । पळे तो वेळा सोडूनी । मनीं खचे ॥ ७१ ॥**

**कर्कोटक नागसुत । कार्तवीर्यावरी येत । त्या जिंकोनी पद[३८] घेत । राजा त्याचें ॥ ७२ ॥**

**पाहोनी हें त्याचें शौर्य । देवांलाही न हो धैर्य । त्याच्यापुढें केवीं वीर्य[३९] । मर्त्य दावीं ॥ ७३ ॥**

**असा राजा बळी जरी । विप्रांवरी प्रीती करी । अतिथींला तो सत्कारी । तारी दीना ॥ ७४ ॥**

**नित्य निजधर्मे वागे । अन्या वागवीतो अंगें । नित्य निजरूपीं जागे । रंगे रूपीं ॥ ७५ ॥**

**(८५०००) पंचाशीति सहस्त्राब्द । राज्य केलें, जेवी अब्द[४०] । वर्षे, दाने दे, न शब्द । कठोर दे ॥ ७६ ॥**

३१. ब्राह्मणाचें लग्न. ३२. अनावृष्ट्यादि. ३३. निर्धनता. ३४. शत्रू. ३५. भूतादि बाधा, दृष्टिदोष, राजादिकांचा रोष, प्रसिद्ध देवी महामारी. ३६.त्याच्या बीजानें युक्त मंत्र. ३७. विलास देणाऱ्या. ३८. स्थान. ३९. पराक्रम. ४०. मेघ.

पुत्रापरी प्रजा पाळी । कधीं कोणा न दे गाळी । विप्राज्ञेतें धरीं भाळीं । बळी जरी ।। ७७ ।।
त्याचें सौभाग्य अमित । पुत्र झाले त्याला शत । ते सर्वही पितृभक्त । सक्त धर्मीं ।। ७८ ।।
दत्तापाशीं एके दिनीं । कार्तवीर्य तो येवुनी । मृदु बोले लीनपणीं । भक्तीभावें ।। ७९ ।।
प्रारब्धाचा भोग धाला । आतां मारा तुम्हीं मला । दत्त म्हणे आतां तूला । कसा मारूं ।। ८० ।।
राजा म्हणे स्वामी ऐका । क्षत्रियांचा देह जो कां । घारातीर्थी[४१] धर्मे चोखा । पडावा जी ।। ८१ ।।
तरीं याला मारणार । समर्थ न सुरासुर । तेथें काय हे पामर । नर बोला ।। ८२ ।।
बोले श्रीदत्त हांसूनी । तुझी निष्ठा ही पाहोनी । वर देतों संतोषोनी । प्रिय भक्ता ।। ८३ ।।
तुला मारो ख्यात्याधिक[४२] । जातमंतुमिषें[४३] ऐक । रणीं तो मी, ऐसी चोख । भाक घे हे ।। ८४ ।।
ऐसें ऐकोनी अर्जुन । वंदोनी, ये संतोषोन । करी अश्वमेध यज्ञ । निष्कामेशी ।। ८५ ।।
कोणी अश्वा न धरिती । अश्वमेध सांग होती । ते देखोनी देवां भीती । येती झाली ।। ८६ ।।
देवीं पाठविला सूर्या । सत्त्व त्याचें हरावया । ये अतिथी होवोनियां । विप्ररूपें ।। ८७ ।।
राजा म्हणे माग इष्ट । तो बोलिला रितें पोट । स्थावरांची४३अ भिक्षा तुष्ट । मातें करी ।। ८८।।
राजा म्हणे देतों ती मी । विप्र न व्हा कोण तुम्हीं । मग सूर्य निजधामीं[४४] । प्रगटला ।। ८९ ।।
धन्य झालों म्हणे राजा । सप्तद्विपींचा उद्‌बीजा । घेयीं, सूर्य म्हणे राजा । घे हे बाण ।। ९० ।।
सोडीं, याहीं ते वाळती । अग्निरूपें तयांप्रती । सेवीं म्हणोनी दे हातीं । भाते सूर्य ।। ९१ ।।
पांचशें तो चाप[४५] जोडी । राजा तेची बाण सोडी । झाले शुष्क वृक्ष तोंडीं । धरी सूर्य ।। ९२ ।।

४१. धर्मयुद्धामध्यें. ४२. ब्राह्मण. ४३. अपराधाच्या निमित्तानें. ४३अ. वृक्षवल्ल्यादि. ४४. स्वकीय रूपानें. ४५. धनुष्य.

**सर्व वृक्ष भस्म झाले । ध्यान सोडुनी देखिलें । वसिष्ठानें, तें पूसिलें । शिष्यवर्गां ॥ ९३ ॥**
**सांगती ते त्या अर्जुनें । वृक्ष शोषीले ये बाणें । ते जाळीले दावाग्नीनें । भूतळींचे ॥ ९४ ॥**
**तेव्हां क्रोधें मुनी वदे । हा आम्हाही नेणें मदें । मरो विप्रहस्तें खांदे । तुटोनी हा ॥ ९५ ॥**
**ऐसा दैवें झाला शाप । तेव्हां उद्धत तो नृप । स्वर्गीं गेला, देवां कोप । ये पाहुनी ॥ ९६ ॥**
**देवीं त्याशीं युद्ध केलें । भूपें देव पळविले । विष्णूला शरण गेले । छिन्नभिन्न ॥ ९७ ॥**
**विप्ररूपें मारूं त्यास । चला म्हणे तो देवांस । देव आले स्वस्थानास । भीत भीत ॥ ९९ ॥**
**विष्णू हो भार्गवराम । मंतूमिषें[४६] त्या संग्राम । करोनी दे परंधाम । भूमानंदें[४७] ॥ १०० ॥**

**इति श्रीदत्तलीलामृताब्धौ कार्तवीर्यप्रतापाख्या तृतीयलहरी संपूर्णा । ओव्या ॥ ३०० ॥**

४६. अपराध. ४७. अपरिछिन्न आनंदानें.

## ।। लहरी ४।।

### ।। श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।।

म[1]हाराज सोमवंशीं । गाधी, कन्या झाली त्यासी । सत्यवती, मागे तीसी । ऋचकर्षी ।।१।।
राजा चिंती कैसी द्यावी । कन्या मान्य जैसी देवी । याला फिरवावा केवीं । शापील हा ।।२।।
मग राजा म्हणे त्याला । माझा एक पण झाला । जो दे श्यामकर्णाश्वांला । सहस्रेंशीं ।।३।।
त्याला कन्या द्यावी ऐसी । प्रतिज्ञा हे तुला कैसी । साधे, मुनि वदे त्यांसी । देतों अश्व ।।४।।
त्यानें तों वरुणापाशीं । अश्वां पाहोनी वेगेंसी । येवोनी तो मुनी त्यांसी । सर्व सांगे ।।५।।
वरुणही तें ऐकोनी । तेव्हां डचकला मनीं । मागें फिरवितां मुनी । शापील हा ।।६।।
अश्वां पाजितां मदिरा[2] । ते न जाती मुनीश्वरा । तो योजूनी या प्रकारा । दे अश्वांतें ।।७।।
योगबळें ते घेवून । आला त्याला तो पाहून । हर्षें देई कन्यादान । मानपूर्व ।।८।।
देव पाहोनी म्हणती । योगीश्वरां मोठी शक्ती । अघटित घटविती । मिती न हो ।।९।।
गाधी म्हणे परगोत्रा । कन्या गेली, न मीं पुत्रा । देखें, म्हणोनी हो भित्रा । मुनिवर्या ।।१०।।
मुनी म्हणे होवो तुला । पुत्र, जातों आश्रमाला । सवें घेवोनी पत्नीला । ताता भेटों ।।११।।
मग पत्नीला घेवोनी । भृगूपाशीं तो येवोनी । सांगे सर्व त्या वंदूनी । भृगू हर्षे ।।१२।।
सत्यवती पतिव्रता । भर्तृ-श्वशुरांच्या चित्ता । धर्में शर्म[3] दे अश्रांता । भृगु तोषे ।।१३।।
बोले इष्ट वर घेयी । सती लीन झाली पायीं । मला योग्य सुता देईं । आयीलाही ।।१४।।

१. प्रणवाचा अंतिम वर्ण. अ उ,म असे शतकादि असून ॐ झाला. २. मद्य. ३. सुख.

मुनी बोले तूं अश्वत्था । औदुंबरा तुझी माता । सेवो संस्कारुनी भाता[४]। खातां सिद्धी ।।१५।।
मग तातगेहीं ये ती । भर्त्यासह तेणे रीती । करी, चरू घेतां भ्रांती । होती झाली ।।१६।।
कन्या मातृचरू[५] भक्षी । माता कन्येचा, ते वीक्षी[६] । ज्ञानदृष्टी भृगू साक्षी । तेथें आला ।।१७।।
म्हणे सुने हो व्यत्यय[७] । तुझा पुत्र हो क्षत्रिय । मातेचा तो विप्र होय । काय केलें ।।१८।।
खिन्न सून पायीं घेई । मिठी, पोटीं विप्र येई । ऐसें करावें उपायीं । म्हणे दीन ।।१९।।
भृगू बोले विप्र होय । पुत्र, पौत्र[८] हो क्षत्रिय । ऐसें आश्वासोनी जाय । निजाश्रमा ।।२०।।
व्याली सत्यवती पुत्र । जमदग्नी जो पवित्र । शंकरांश ज्ञानपात्र । मंत्रद्रष्टा[९] ।।२१।।
तीची माता व्याली पुत्र । नामें तो हो विश्वामित्र । विप्रपूज्य हो सर्वत्र । मंत्रबळें[१०] ।।२२।।
गौरीकला रेणूसुता । जमदग्नीची ती कांता[११] । रेणुकाख्या पतिव्रता । शांताकारा ।।२३।।
तिला झाले तीन सुत । चौथा पोटीं ये साक्षात । केशवांश जो विख्यात । रामनाम ।।२४।।
वेदशास्त्र तो पढला । धनुर्वेदाभिज्ञ झाला । ज्याणें शिवा तोषविला । शिष्यधर्में ।।२५।।
एके दिनीं ती रेणुका । देखे गंधर्वनायका । नदीमध्यें घे स्त्रीसुखा । मुखा चोंखी ।।२६।।
तें पाहोनी ती भुलली । किंचिज्जळांत चालिली । दैवें मनीं डचकली । ओली आली ।।२७।।
म्हणे कैसी झाली भूल । आतां पती कीं शापिल । त्वरें घेवोनी ये जल । शीलवती ।।२८।।
पती कोपें तिला बोलें । तोंड न दावीं आपुलें । वाटती जे तुला भले । चाले तेथें ।।२९।।
तेव्हां थरथर कापे । पुत्रा सांगे मुनी कोपें । ईचा मुंडा तोडा पापें । जाती तेव्हां ।।३०।।

४,५. होमशेष भात. ६. अवलोकन करी. ७. बदलणें. ८. नातू. ९. वेदमंत्रांचा ज्ञाता ऋषि. १०. गायत्री मंत्राच्या शक्तीनें. ११. भार्या.

तिघेही ते स्नेहें भ्याले । तीचें शीर न तोडीलें । तातें त्यांतेंही शापिलें । केलें भस्म ।।३१।।
रानीं समिद्दर्भांसाठीं । राम गेला तो ये पाठीं । तेव्हां मुनीची ये दृष्टी । तयावरी ।।३२।।
बोले ही हो अमंगळा । रामा ईचा काटी[१२] गळा । न विचारीं तूं ये वेळा । बलाढ्या रे ।।३३।।
राम मनीं न शंकितां । हातीं परशू जो होता । तीच्या कंठीं तो मारितां । तुटे शीर ।।३४।।
धड पडे भूमीतळा । वाहे लोह[१३] भळा भळा । जरीं राम पाहे डोळां । तरीं न भी ।।३५।।
तेव्हां शांत झाला मुनी । म्हणे रामा आलिंगोनी । माझे वाक्यें त्वां जननी । मारीली हे ।।३६।।
पूर्ण तूं रे पितृभक्त । धन्य हो तूं अनासक्त । आतां काय तुझें चित्त । वर इच्छी ।।३७।।
राम म्हणे माझी माता । उठो बंधू तेही आतां । चिरंजीवित्व दे ताता । विजयत्व ।।३८।।
माझ्याहुनी न हो शूर । कोणी युद्धीं धुरंधर । मुनी बोले दिल्हे वर । रामा हे म्यां ।।३९।।
तेव्हां आपोआप शीर । जडे तेव्हां ती सत्वर । उठे तैसे ते भ्रातर । जिते झाले ।।४०।।
राम मनीं आनंदला । पायीं मातेच्या लागला । तीणें त्याला आलिंगीला । पुत्रस्नेहें ।।४१।।
म्हणे धारातीर्थी पुत्रा । शुद्ध केलें माझ्या गात्रा । पुनः याच्या स्मृतिमात्रा । न शीवसी ।।४२।।
पातिव्रत्या सांभाळी ती । ह्या ख्यातीतें धरो चित्तीं । जातां अन्याठायीं वृत्ती । गती ऐशी ।।४३।।
उँ:रे चित्ता कामासक्ता । आम्हां बुडविशी संता । तुला धिक् धिक् तूं हो आतां । शांत दांत ।।४४।।
काम ठाईचा चावटा । भल्याचाही करी तोटा । बुडवी हा कट कटा । मोठा खोटा ।।४५।।
लुटी सर्वां, ऐशा चोरा । कां देशी रे चित्ता थारा । आतां धरीं सुविचारा । सारासारा ।।४६।।
मोक्ष किंवा स्वर्गलोक । तुझ्यायोगें ये नरक । तेव्हां आतां तूंच ऐक । एक सांगे ।।४७।।

१२. तोडी. १३. रक्त.

मुमुक्षेचा[१४] करीं काम । प्रियपादीं घे विश्राम । तेणें लाभें सर्वोत्तम । धाम[१५] जे तें ॥४८॥
ऐसें चित्त वळवूनी । साध्वी ठेवी स्थिरवूनी । भर्तृपादीं लीनपणी । सेवी भावें ॥४९॥
एके दिनीं तो अर्जुन । जाता वनीं विलोकून । जमदग्न्याश्रमस्थान । आला तेथें ॥५०॥
तो रेणुका मुनीश्वर । पाहे जेवी गौरीहर । प्रेमें करी नमस्कार । दूर राहे ॥५१॥
मुनी भूपा बैसवूनी । पुसे क्षेम समाधानीं । कामधेनुप्रसादोनी । त्या जेववी ॥५२॥
राजा वदे दे धेनूसी । देतों धन गोधनासी । मुनी म्हणे देऊं कैसी । होमधेनू ॥५३॥
बलात्कारें त्या धेनूला । राजा घेवोनी चालला । मागें वनांतूनी आला । राम वेगें ॥५४॥
धेनू नेली हें ऐकोनि । भूपावरी तो कोपोनी । हातीं परशू घेवूनी । धांवे वेगें ॥५५॥
मेघगंभीर वचनें । फिरवूनी भूपा म्हणे । रे रे चोरा माझे भेणें । न घेसी कीं ॥५६॥
राजा नव्हे तूं चोरटा । कुळा लावीयेला बट्टा । न मानी हे मूर्खा थट्टा । कंठा छेदीं ॥५७॥
भेदीं तुझ्या वक्षस्थळा । दावी कळा तूं कूशळा । क्षत्रा[१६] पाहे विप्रबळा । बळावें त्वां ॥५८॥
तेव्हां रामा पाहे भूप । तो त्या भासे उग्ररूप । जेंवी अग्नी खातां तूप । ज्वाळामाळी ॥५९॥
न हा विप्र शस्त्रधारी । माझ्यासाठीं आला हरी । याशीं युद्ध घोर करी । मारील हा ॥६०॥
लहान हा दिसे परी । द्यावी वामनाची सरी । ऐसें विचारूनी करी । स्वारी भूप ॥६१॥
तेव्हां पंचशत चाप । सज्ज करी करीं[१७] भूप । राहे रामाच्या समीप । तपनसा[१८] ॥६२॥
न साहिला यत्प्रताप । कोणी, तो हा दीप्तरूप । सहस्त्रकर अमूप । तपःसिद्ध ॥६३॥
सिद्धसाध्य देवमुनी । स्वर्गीं विमानीं बैसोनी । युद्ध पाहती हर्षोनी । मनीं तेव्हां ॥६४॥

१४.मुक्ती होण्याची इच्छा. १५. ब्रह्मस्वरूप. १६. कार्तवीर्यार्जुना. १७. हातांत. १८. सूर्य

अचूक त्याचें संधान । सोडी पांचशे मार्गण[१९] । वेळोवेळ आच्छादून । ठेवी राम ।।६५।।
वेळोवेळ अभिनव । शस्त्र सोडी वेगें राव । पाहूनी हस्तलाघव । राम हर्षे ।।६६।।
राम म्हणे वीर धन्य । याला मारी कोण अन्य । प्रतापी हा भंगशून्य[२०] । मान्य वीरां ।।६७।।
राम तोडी त्याचे बाण । तरी मारी तो दारुण । मग परशू घेवून । बाहू तोडी ।।६८।।
तोडी बाहू पटपटा । शस्त्र वाजे खटखटा । पडती ते चटचटा । उठाउठी ।।६९।।
बाहू जेथोनी तुटती । पुनः तेथोनी फुटती । तेही हाणाया उठती । मती खचे ।।७०।।
खचे राम तेव्हां मनीं । ध्वनी[२१] झाला व्योमांतूनी । पूर्वी न टाकीं तोडुनी। बाहू याचे ।।७१।।
दत्तात्रेयवरें जाण । उरीं भुजबीजस्थान । आहे पूर्वीं तें शोषून । छेदीं मग ।।७२।।
तेव्हां आग्नेयास्त्रे राम । शोषून घे तन्निर्गम[२२] । मग भूप जपे नाम । श्रीदत्ताचें ।।७३।।
रामें ते भुज तोडिले । दोन अभेद्य राहिले । बाहूंचे पर्वत झाले । भूमीतळीं ।।७४।।
दोघे वीर अनिवार । महाशूर महाधीर । करूं वांच्छिती जर्जर । परस्परां ।।७५।।
सोडिताती वारंवार । तोडिताती परस्पर । शस्त्रें दोघे भराभर । मार देती ।।७६।।
राम चिंती स्वगुरुला । तेव्हां भूप समजला । म्हणे अंतकाळ आला । ह्या देहाचा ।।७७।।
मग गुरूपदेशातें । आठवूनी इंद्रियातें । मनी योजी त्या मनातें । प्राणामध्यें ।।७८।।
धारणेनें प्राण योजी । अनुक्रमें राजा तेजीं । तेजा तेजःपुंजामाजीं । योजी योगें ।।७९।।
अखंडैकरसत्व जें । तत्त्वंपदार्थांचे साजे । जेथें कांही नसे दुजे । भेज त्या तो ।।८०।।

१९. बाण. २०. पराजय न झालेला. २१. शब्द. २२. भुज उत्पन्ना होणारें बीज.

तेव्हां राम तोडी शीर । खालीं पडे कलेवर[२३] । झाला जयजयकार । सुरलोकीं ॥८१॥
कार्तवीर्य दत्तभक्त । ब्रह्मनिष्ठ जीवन्मुक्त । झाला राम हा निमित्त । त्याच्या वधा ॥८२॥
मूर्धा[२४] अर्जुनाचा फुटला । लिंगदेह भिन्न झाला । स्वकारणीं गेल्या कला । समरसे ॥८३॥
स्वये होय स्वयंज्योती । पाहोनी ही त्याची गती । देवां करोनी प्रणती । स्तुती केली ॥८४॥
पुष्पवृष्टी रामावर । करिती ते सुरवर । झाला वाद्यांचा गजर । सुरलोकीं ॥८५॥
भूपा लाधले परंधाम[२५] । परंतू घेतां तन्नाम[२६] । अद्यापी हो नष्टागम । क्षेम लोकां ॥८६॥
वीर समागमें होते । परशूनें त्या सर्वांतें । रामें मारूनी धेनूतें । मुक्त केली ॥८७॥
राम घेवूनी धेनूतें । आला शीघ्र स्वाश्रमातें । वंदूनी जमदग्नीतें । सांगे सर्व ॥८८॥
मुनी म्हणे हाय हाय । पुत्रा केलें त्वां हें काय । शीरीं घेतला अपाय[२७] । जा येथूनी ॥८९॥
अरे आम्हां राजाश्रय । तपःसिद्धी देयी श्रेय । जरी नेता एक गाय । काय हानी ॥९०॥
जो संरक्षी सप्तद्वीपा । निवारी जो पापा तापा । पुण्यश्लोका ऐशा भूपा । कां मारीलें ॥९१॥
श्रीदत्ताचा शिष्य योगी । ऐसा न हो दुजा जगीं । स्वल्पदोषें वीतरागी[२८] । तो मारिला ॥९२॥
ऋद्धी सिद्धी ज्याच्या दासी । दे अमित गोदानासी । या धेनूची चाड त्यासी । काय बोल ॥९३॥
लीलेनें ही धेनू नेली । त्याची ग्रीवा[२९] त्वां तोडिली । राम म्हणे गती झाली । प्रारब्धें ही ॥९४॥
तें ऐकूनी बोले मुनी । दहा श्रोत्रिय[२९अ] मारूनी । पाप जें, तें ये लागुनी । भूपवधें ॥९५॥
अभिषेक शिरावरी । झाला त्याला ठार मारी । तो भूप्रदक्षिणा करी । तरी शुद्ध ॥९६॥

२३. देह. २४. मस्तक. २५. ब्रह्मस्वरूप. २६. श्लोक- कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहुसहस्रवान्। तस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते।।. २७.राजहत्या. २८. वैराग्यशाली. २९. मान. २९अ. अग्निहोत्री ब्राह्मण.

**आतां जाईं तूं येथून । करीं सर्वतीर्थी स्नान । तेव्हां हें पाप जावून । शुद्ध होशी ।।९७।।**

**रामें ती आज्ञा मानून । केलें सर्वतीर्थी स्नान । पुनः भेटला येवून । जनकातें[३०] ।।९८।।**

**शतपुत्र अर्जुनाचे । और्ध्वदेहिक ताताचें । आचरोनी मागें वाचें । बोलती हें ।।९९।।**

**विप्र असोनी दे बळी । भूपाचा त्या तिळांजळी । करूं आमुची ते वेळीं । ऋण मुक्ति ।।१००।।**

**इति श्रीदत्तलीलामृताब्धौ अर्जुनमुक्तिश्चतुर्थलहरी संपूर्णा ।। ओव्या ।। ४००।।**

३०. जमदग्नीप्रत.

## ।। लहरी ५।।

### श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।।

म[१]हावनीं समिधांसी । घ्याया राम गेला त्यासी । न जाणोनी आश्रमासी । शत्रू आले ।।१।।
सर्वे सैन्य ते घेवोनी । त्याच्या आश्रमा वेढूनी । रामा शोधिती घुसोनी । गृहामध्यें ।।२।।
होमस्थानी ते पाहती । जमदग्नी तपोमूर्ती । त्याला जावूनी धरती । मतिहीन ।।३।।
दीन वाचें वदे मुनी । काय लाभ ह्या मारूनी । आशीर्वादा स्वीकारूनी । मागें चला ।।४।।
मला सोडा म्हणे वीरां । बोले रेणूका पदरा । पसरितें मुनीश्वरा । तारा बापा ।।५।।
बापा माझ्या प्राणधारा । सोडा जोडा यशा शूरां । हें योग्य हो दीनोद्धारां । वारा तापा ।।६।।
आम्हीं आश्रित जाणोन । दाते तुम्ही व्हा प्रसन्न । मला द्या सौभाग्यदान । मानपूर्व ।।७।।
मान पूर्वी तोडा माजी । अथवा तुम्ही व्हा राजी । ऐसें बोले, तीस पाजी । राजी ते न ।।८।।
ते न भीतां पापा वीर । तोडूनी मुनिचें शिर । पुरा चालिले सत्वर । क्रूर सारे ।।९।।
करी रेणुका विलाप । म्हणे माझें कैंचे पाप । उदेलें हें जें दे ताप । माप न ज्या ।।१०।।
हाय हाय करूं काय । म्हणे नीती झाडी पाय । शिरा उरावरी घाय । माय दे ती ।।११।।
देती सुत आश्वासन । परी तीचें खिन्न मन । म्हणे देवा धांवा दीन । झालें मी हो ।।१२।।
रामा तू अंतरलासी । संधी लाधला शत्रूंशी । येरे  प्राण देतें ऐसी । विलापी ती ।।१३।।
तेव्हां राम वनांतून । आला समिधा घेऊन । सर्व अनर्थ ऐकून । दीन झाला ।।१४।।
राम म्हणे मन्निमित्त । झाला तुझा ताता घात । ऐसा तुझा मी अहित । सुत नोहे ।।१५।।

१. ॐकाराचा अंतिम वर्ण (व्युत्क्रमानें पुन्हां ॐकार जाणावा)

आठवूनी त्याचे गुण । शोक करी तो दारुण । म्हणे आतां मला कोण । जाणता हो ।।१६।।
धडधडां अश्रू वाहे । घडबडां लोळे स्नेहें । पितृशोकातें न साहे । मोहे राम ।।१७।।
मग डोळे पुसोनी तो । म्हणे शत्रूपुरा जातों । कीर्तवीर्यजां[1] मारितों । घेतों सूड ।।१८।।
हातीं परशू घेवोनी । जातां त्या भ्राते जननी । निवारीती, तें न मनीं । कानीं घे तो ।।१९।।
माहिष्मतीसी[2] जावूनी । सर्व शत्रूंला मारुनी । क्षणें मागें तो फिरोनी । सदनी[3] ये ।।२०।।
म्हणे अर्जुनाचे पोर । मारिले, जें नृपवर । करीं त्यांचाही संहार । त्रिसप्तधा[4] ।।२१।।
त्यांच्या रक्ताचा प्रवाह । त्याचे करीं पांच डोह । तर्पीं तेथें पित्रासह । मुक्त व्हाया ।।२२।।
माता म्हणे पूर्वी कर । रामा आमुचा संस्कार । मग करीं तूं संहार । क्षत्रियांचा ।।२३।।
दत्तशिष्य अर्जुन रे । तो मारिला हें न बरें । दत्त कोपे जरी बारे । तूं मरसी ।।२४।।
यासी उपाय सांगेन । आम्हां दोघां तूं घेवोन । जायी आता रे येथोन । दक्षिणेसी ।।२५।।
जेथें होय व्योमध्वनी[5] । तेथें श्रीदत्ता भेटुनी । होसी धन्य रामा, मनीं । निर्धारी हें ।।२६।।
मग राम कावडींत । एकीकडे मृत तात । मातेलाही बैसवीत । एकीकडे ।।२७।।
राम कावडी घेऊन । कान्यकुब्ज देशांतून । चाले दत्तातें चिंतून । दक्षिणेसी ।।२८।।
देखे गिरी नदी वन । माहोरासि ये चालून । तेथें आकाशवचन । कानीं पडे ।।२९।।
दत्ता आचार्य करून । त्वन्माता सहगमन । करो करीं जलदान । विधीनें तूं ।।३०।।
ऐशा आकाशवाणीला । परिसोनी कावडीला । ठेवोनी तो आश्रमाला । गेला पाहु ।।३१।।
समीपची दत्ताश्रम । दिसे जेथें नसे श्रम । नष्ट होती सर्व भ्रम । क्रम नको ।।३२।।

१. कार्तवीर्याचे मुलगे. २. महेश्वर. ३. घरीं. ४. एकवीस वेळ=सूचनार्थ ओंवीचा अंकही २१ जाणावा. ५. आकाशवाणी.

**अहिंसेचा पूर्ण वास । केवीं राहे वैर त्रास । सर्वर्तूंचा जेथें वास । सर्वकाळ ।।३३।।**
**राम आश्रमीं जाऊन । देखे श्रीदत्तचरण । दत्तें मायेचें मंडन । पसरिलें ।।३४।।**
**जीच्या नखाग्रावरून । अप्सरांला ओवाळून । टाकीजे मुखावरून । चंद्रालाही ।।३५।।**
**कोटी कंदर्प[६] गाळून । वाटे ओतिलें लावण्य । तेजी सूर्या कुर्वंडून । टांकावें कीं ।।३६।।**
**दंतहीरे चमकती । ओंठ बिंबाला[७] लाजवीती । शुक नासिके भूलती । नेत्रां पद्में ।।३७।।**
**जीची कटि ती देखोन । सिंह मनीं होई खिन्न । गज देखोनी गमन । भांबावले ।।३८।।**
**कंठ शंखाते भूलवी । नाभी आवर्ता[८] बरवी । रोमरोमीं भासे रवी । छबी ऐसी ।।३९।।**
**ऐसी ललना येवून । कंठी मिठी ती घालून । प्रेमें चुंबन देवून । अंकी बैसे ।।४०।।**
**परस्परें हावभाव । दाविताती अभिनव । जेथें नसे भिन्नभाव । ठाऊकाची ।।४१।।**
**ऐसा मायेचा हा थाट । काय वर्णावा अचाट । याचा मानती जे वीट । धीट तेची ।।४२।।**
**ऐसी होतां त्यांची क्रीडा । राम आला त्याची व्रीडा[९] । न धरीतां हो नागडा[१०] । तीशीं दत्त ।।४३।।**
**राम साष्टांगे नमून । बोले जी सहगमन । माता करीते आपण । आचार्य व्हा ।।४४।।**
**दत्त म्हणे नेणे विधी । न सेवी हे मी उपाधी । अस्पृश्य अभाष्य[११] आधीं । पाहें तूं हें ।।४५।।**
**राम झाला निरुत्तर । रेणुका ते दे उत्तर । यथार्थ हें वाक्यसार । फार गोड ।।४६।।**
**तीन गुणा वास जेथें । विधीनिषेध ये तेथें । जन्म मृत्यू दुःख तेथें । थारा करी ।।४७।।**
**तुम्ही तरी गुणातीत । नित्य उपाधीवर्जित । तीनी देहा साक्षीभूत । दोन्हीकडे१२ ।।४८।।**

६. काम. ७. पिकलेंलें तोंडलें. ८. भोंवऱ्यापरी. ९. लज्जा. १०. दिगम्बर- निरावरण. ११. बोलण्यास अयोग्य १२. पिंडीं व ब्रह्मांडीं.

शब्दस्पर्शादि विषय । होती इंद्रियाला ग्राह्य । तुम्ही तरी अविषय । स्पर्शहीन ।।४९।।
जरी आपुल्या प्राप्तीला । शाब्द[१३] प्रमाण बोलिलां । तरी परोक्षत्वें भला१४ । होवू तेंही ।।५०।।
श्रवणाचें जें मनन । त्याचेंही निदिध्यासन । वृत्तिव्याप्तीनें दे भान । अपरोक्ष ।।५१।।
तेव्हां अस्पृश्य अभाष्य । वाक्याचें हें ऐसें भाष्य । आधिशब्दें मी अमृष्य । लक्षी ऐसें ।।५२।।
अभिव्याप्ती आ अव्ययें । अधिशब्दें ईशता ये । सर्वांतर्यामीला नये । नियम्यता ।।५३।।
पाहें तूं हें या वचनें । तत्त्वंपदार्थैक्य होणें । नरा योग्य हें बोलणें । जाणें मी हो ।।५४।।
तेव्हां हंसोनी श्रीदत्त । रेणुकेच्या पुढें येत । स्तवी, माते तूं साक्षात । आदिशक्ती ।।५५।।
तुझा पसारा हें जग । कैसी होसी भिन्न मग । असो हें तूं कार्य सांग । काय तूझें ।।५६।।
ती बोले मी सती जातें । पतीसवें दत्त तीतें । वदे कोणीं त्वत्पतीतें । मारियलें ।।५७।।
राम वदे क्षत्रियांनीं । मारिला, हें परिसोनी । दत्त बोलिला कोपोनी । गर्जोनियां ।।५८।।
ब्रह्मघ्नहो हे क्षत्रिय । यांचा होवो कुळक्षय । राम वदे दत्तपाय । धरोनीयां ।।५९।।
क्षत्रियांचें निर्दळण । करीं ऐसा केला पण । सिद्धी देती हे चरण । आण वाहें ।।६०।।
तुमचा जो शिष्य योगी । अपराध करी उगी । त्या म्यां मारिला हा अंगीं । नसो दोष ।।६१।।
दत्त वदे मदंशें तूं । त्याच्या प्रारब्धाचा हेतू । झालासी, जा जय घे तूं । मारीं भूपा ।।६२।।
रामा होशील समर्थ । बाण सोडीं सर्व तीर्थ । तुझ्या मातेच्या स्नानार्थ । आणीं वेगीं ।।६३।।
तेव्हां राम सोडी बाण । त्यांहीं भूमी विदारून । सर्व तीर्थें तीं आणून । दिल्हीं रामा ।।६४।।
माता तेथें करी स्नान । मातृतीर्थ त्यापासून । झालें प्रसिद्ध दोषघ्न । अद्यापी जें ।।६५।।

१३.आप्तवाक्य. १४. अपरोक्षानुभव तर मनननिदिध्यासनावाचून होणारच नाहीं हा भावार्थ.

वस्त्रालंकार भूषित । माता होवूनी बोलत । रामा हो तूं दत्ताश्रित । नीत धरीं ॥६६॥
करीं तुझें सत्य बोल । गोब्राह्मणां प्रतिपाळ । जातें पतीशीं ये मूळ[१५] । माहेराचें ॥६७॥
ऐसें बोले हास्यमुख । राम मनीं करी दुःख । दत्त म्हणे चित्तीं राख । रामा बोधा ॥६८॥
तेथें स्त्रियांसह देव । येती ऋषी तीचा भाव । पाहतांची चित्तीं वाव । नसे हर्षा ॥६९॥
भावें सूर्याला वंदून । तीणें वाणेही वांटून । केल्या प्रदक्षिणा तीन । त्या अग्नीला ॥७०॥
आज्ञा श्रीदत्ताची घे ती । स्त्रिया रतिभोगा जाती । तैशी पतीशीं ती सती । आग[१६] रिघे ॥७१॥
अश्वमेध पदोपदीं । जीला झाले जातां आधी । औट[१७] कोट रोमें साधी । स्वर्गीं वास ॥७२॥
एका एका रोमें तीस । कोटी कोटी वर्षें वास । ऋषीमंडळी हो खास । पतीसह ॥७३॥
सतीस्पर्शें अग्नी शोभे । सहस्त्रार्कसम उभे । देव पाहती त्या शोभे । स्त्रियांसह ॥७४॥
रेणुका हे धन्य सती । धैर्य इच्या चित्तीं किती । स्त्रियां ऐशी होवो मती । म्हणती ते ॥७५॥
देवीं जयजयकार । केला, आला गहिंवर । रामा त्याला दत्त धीर । दे बोधानें ॥७६॥
सर्व स्वस्थानासी जाती । दत्त क्रिया करविती । स्वयें आचार्यही होती । काय बोलूं ॥७७॥
क्रिया होतां वदे दत्त । रामा तुझे माता तात । कोठें गेले हें जाणत । अससी कीं ॥७८॥
राम म्हणे मेले गेले । स्वर्गीं दत्त त्याला बोले । नाहीं मेले नाहीं गेले । पहा हे तूं ॥७९॥
राम पाहे तों दीसती । दत्त बोले जाणें चित्तीं । लीलाविहारी हे होती । गौरीहर ॥८०॥
सर्वेंची ते झाले गुप्त । रामा सांगतसे दत्त । करी क्षत्रियांचा घात । माझ्या बळें ॥८१॥
रामें एकवीस वेळ । निःक्षत्रिय भूमंडळ । केलें रक्तें पांच तळें । भरियेलीं ॥८२॥

१५. बोलावणें. १६. अग्निप्रवेश करी. १७. साडे तीन कोटी केशानें.

